राज्यात सन २०२१ व २०२२ या कालावधीत झालेल्या गारपीट व अवेळी पावसामुळे शेतीपिकाच्या नुकसानीपोटी बाधित शेतकऱ्यांना मदत वाटप करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक- सीएलएस २०२२/प्र.क्र.०८/म-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ५ जून, २०२३

**वाचा :-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०१५/प्र.क्र.४०/म-३,दि.१३.०५.२०१५
२) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे क्र.उपआ/नैआ/पुनर्व/म.स./कावि-२२/२०२२, दि.१७.०१.२०२२
३) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे क्र.उपआ/नैआ/पुनर्व/म.स./कावि-२७/२०२२, दि.१६.०२.२०२२
४) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे क्र.उपआ/नैआ/पुनर्व/म.स./कावि-५२/२०२२, दि.०४.०३.२०२२
५) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे क्र.उपआ/नैआ/पुनर्व/म.स./कावि-५५/२०२२, दि.०८.०३.२०२२
६) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे क्र.उपआ/नैआ/पुनर्व/म.स./कावि-१३९/२०२२, दि.०९.०६.२०२२
७) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे क्र.उपआ/नैआ/पुनर्व/म.स./कावि-२६५/२०२२, दि.१५.०९.२०२२
८) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे क्र.उपआ/नैआ/पुनर्व/म.स./कावि-३३९/२०२२, दि.१७.१०.२०२२
९) विभागीय आयुक्त, कोकण यांचे क्र.मशा/कार्या-६/ऑगस्ट-सप्टेंबर, २०२१ नि.प्र./कावि-/२०२१,दि.०९.१०.२०२१
१०) विभागीय आयुक्त, कोकण यांचे क्र.मशा/कार्या-६/नै.आ./एप्रिल ते डिसेंबर-२१/निधी मागणी/कावि/२०२२, दि.२३.०३.२०२२
११) विभागीय आयुक्त, कोकण यांचे क्र.मशा/कार्या-६/नै.आ./फेब्रु.मार्च,एप्रिल,मे,जून,२०२२ /शे.पि.नुक.रत्नागिरी/कावि २२६३५/२०२२,दि.२८.०७.२०२२
१२) विभागीय आयुक्त, कोकण यांचे क्र.मशा/कार्या-६/नै.आ./अति.अनुदान मागणी जिल्हा सिंधुदूर्ग/कावि-७२३८/२०२२,दि.२३.०९.२०२२
१३) विभागीय आयुक्त, पुणे यांचे क्र.नैआ/कावि/२२९/२०२२, दि.१८.०८.२०२२
१४) विभागीय आयुक्त, पुणे यांचे क्र.नैआ/कावि/४६५,४६७/२०२१, दि.१०.११.२०२१
१५) विभागीय आयुक्त, पुणे यांचे क्र.नैआ/कावि/६४६/२०२१, दि.१३.१०.२०२१

१६) विभागीय आयुक्त, पुणे यांचे क्र.नैआ/कावि/२३/२०२२, दि.०९.०३.२०२२
१७) विभागीय आयुक्त, पुणे यांचे क्र.मह-३/नैआ/कावि/४१/२०२२, दि.०९.०३.२०२२
१८) विभागीय आयुक्त, पुणे यांचे क्र.मह-३/नैआ/कावि/२३/२०२२, दि.०९.०३.२०२२
१९) विभागीय आयुक्त, पुणे यांचे क्र.मह-३/नैआ/कावि/३०/२०२२, दि.१६.०३.२०२२
२०) विभागीय आयुक्त, पुणे यांचे क्र.मह-३/नैआ/कावि/८०/२०२२, दि.२९.०३.२०२२
२१) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे क्र.मशा/कार्या-/२/टंचाई/२०२१/ज-३/जा.क्र.२३९३६, दि.०८.१२.२०२१
२२) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे क्र.मशा/कार्या-/२/टंचाई/२०२२/ज-३/जा.क्र.१३०८०, दि.२७.०९.२०२२
२३) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे क्र.मशा/कार्या-/२/टंचाई/२०२२/ज-३/जा.क्र.१३०८२, दि.२७.०९.२०२२
२४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद (छ.संभाजीनगर) यांचे क्र.२०२२/ससंता/ताळमेळ/ नैआ/पाटं/कावि-११८, दि.२४.०२.२०२२
२५) विभागीय आयुक्त, औरंगाबाद (छ.संभाजीनगर) यांचे क्र.२०२१/नैआ/पाटं/कावि-१९१, दि.०४.११.२०२२
२६) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.०८/म-३,दि.०८.०८.२०२२
२७) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.६७/म-११,दि.२४.०१.२०२३.
२८) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.२९४/म-३,दि.२७.०१.२०२३
२९) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३, दि.२७.०३.२०२३

**<u>प्रस्तावना:</u>-**

राज्यात सन २०२१ व २०२२ या कालावधीत गारपीट व अवेळी पावसामुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्याचे निर्दशनास आले होते. त्याप्रमाणे विभागीय आयुक्त यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांच्या अनुषंगाने वेळोवेळी निधी वितरीत करण्यात आला आहे. तथापि, कोविड-१९ च्या प्रादुर्भावामुळे तसेच इतर काही कारणांमुळे निधी मागणीच्या काही प्रस्तावांवर कार्यवाही झाली नसल्याचे निदर्शनास आले होते. त्यामुळे शेतीपिकांच्या व इतर नुकसानीसाठी आवश्यक असलेल्या मदतीचे प्रस्ताव शासनास पाठविण्याच्या सुचना देण्यात आलेल्या होत्या. सर्व विभागीय आयुक्त यांचेकडुन संदर्भाधीन क्र.२ ते २५ येथील पत्रान्वये हे प्रस्ताव प्राप्त झाले आहेत. हे प्रस्ताव मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्य कार्यकारी समितीच्या दि.३१ मार्च, २०२३ रोजी झालेल्या बैठकीत निर्णयार्थ ठेवण्यात आले होते. या बैठकीतील निर्णयानुसार बाधितांना मदत देण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>-**

सन २०२१ व २०२२ या कालावधीत गारपीट व अवेळी पावसामुळे शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान व मालमत्तेच्या नुकसानीकरिता बाधित शेतकऱ्यांना मदत वाटप करण्यासाठी **या** शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्रात लेखाशीर्षनिहाय दर्शविल्याप्रमाणे एकूण **रू.४०१७०.७०**

**लक्ष (रुपये चारशे एक कोटी सत्तर लक्ष सत्तर हजार फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. शेतीपिके व बहुवार्षिक पिकाच्या नुकसानीसाठी मदतीचे वाटप करताना खालील दक्षता घेण्यात यावी:

i) प्रचलित नियमानुसार शेती/ बहुवार्षिक फळपिकाच्या नुकसानीकरीता मदत ३३ टक्के अथवा त्याहून अधिक नुकसान झालेल्यांना अनुज्ञेय राहील.

ii) प्रचलित पध्दतीनुसार कृषी सहायक, तलाठी व ग्राम सेवक यांच्या संयुक्त स्वाक्षरीने पूर्ण करण्यात आलेल्या पंचनाम्यानुसार बाधित शेतकऱ्यांना मदतीचे वाटप करण्याकरिता तहसिलदार यांनी विहित नमुन्यात संगणकीय प्रणालीवर तातडीने माहिती भरावी.

iii) बाधित शेतकऱ्यांच्या बँक खात्यात मदतीची रक्कम थेट जमा करण्यात येईल.

iv) कोणत्याही बाधित शेतकऱ्यास रोखीने किंवा निविष्ठा स्वरुपात मदत देवू नये.

v) मदतीची रक्कम खातेदारांच्या बँक खात्यावर थेट जमा करताना मदतीच्या रक्कमेमधून कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसुली करु नये याकरिता सहकार विभागाने योग्य ते आदेश निर्गमित करावेत.

३. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्रात लेखाशीर्षनिहाय व जिल्हानिहाय दर्शविल्याप्रमाणे कार्यासन म-११ यांनी हा निधी वितरित करावा. सर्व संबंधित जिल्हाधिकारी यांनी वर अनुक्रमांक २७ येथे नमूद दि.२४ जानेवारी, २०२३ अन्वये सूचित केल्यानुसार या प्रस्तावाअंतर्गत असलेल्या शेतीपिकांच्या नुकसानीच्या सर्व लाभार्थ्यांची माहिती विहित नमुन्यात तयार करुन ती संगणकीय प्रणालीवर भरावी. ही माहिती भरतांना द्विरूक्ती होणार नाही व राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या निकषांचे पालन होईल याची खात्री करण्यात यावी.

४. वरील निधी खर्च करताना सर्व संबंधित शासन निर्णयातील सुचनांचे व निकषांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून द्यावयाच्या मदतीचे प्रचलित दर विचारात घेउुन या दराने मदत प्रदान करण्यासाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या लेखाशीर्षाखाली वितरित करण्यात आलेला निधी खर्च करण्यात यावा. ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा. ही मदत देताना केंद्र शासनाने चक्रीवादळ, पूर इत्यादी नैसर्गिक आपत्तीकरिता विहित केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याची खात्री सर्व संबंधितांनी करावी.

५. त्याचप्रमाणे एका हंगामासाठी एक वेळेस मदत अनुज्ञेय असल्याने लाभार्थ्यांची माहिती तयार करतांना व्दिरुक्ती होणार नाही याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी. तसेच राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या निकषानुसारच मदत दिली जाईल याची देखील दक्षता घेण्यात यावी. यासाठी सर्व तहसिलदार यांनी जिल्हाधिकारी यांना आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करावे. त्यानंतरच संगणकीय प्रणालीवर लाभार्थ्यांची माहिती अपलोड करावी.

६. लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्ह्यांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा. या सर्व सूचनांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

७. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून तसेच राज्य शासनाच्या निधीमधून उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

८. वरील प्रयोजनासाठी प्रधान लेखाशिर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळे इत्यादी अंतर्गत सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली आर्थिक वर्ष २०२३-२४ मध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून खर्च करण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : १६८/२०२३/व्यय-९, दि.१५.०५.२०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०६०५१५००३७६०१९ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SANJAY AUDUMBAR DHARURKAR

Digitally signed by SANJAY AUDUMBAR DHARURKAR
DN: CN = SANJAY AUDUMBAR DHARURKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = RELIEF AND REHABILITATION DEPARTMENT
Date: 2023.06.05 17:20:18 +05'30'

**(संजय औ. धारूरकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अप्पर मुख्य सचिव (वित्त),मंत्रालय,मुंबई
२. प्र.सचिव (कृषी), मंत्रालय,मुंबई,
३. संबंधित सर्व विभागीय आयुक्त
४. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संबंधित सर्व जिल्हाधिकारी
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७. महालेखापाल (लेखा परीक्षण), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
८. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, बृहन्मुंबई.
१०. संबंधित सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
११. सह सचिव व वित्तिय सल्लागार (कार्यासन म-११), मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई यांना बीम्स प्रणालीवर निधी वितरित करण्याच्या विनंतीसह अग्रेषित
१२. कार्यासन अधिकारी , कार्यासन( अर्थसंकल्प-६/व्यय-९) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
१३. निवडनस्ती म-३ कार्यासन.

शासन निर्णय क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.०८/२०२२/म-३, दि. ५ जून २०२३ सोबतचे प्रपत्र

सन २०२१ ते २०२२ या कालावधीतील निधी वितरणाबाबतचा तपशिल (रु. लाखात)

| अ. क्र. | विभागीय आयुक्त | कालावधी | प्रस्तावाचा दिनांक | जिल्हा | शेतीपिके नुकसान - शेतकऱ्यांना निविष्ठा अनुदान | | नैसर्गिक आपत्तीमध्ये घरे पुर्णत: क्षतीग्रस्त झाली असल्यास कपडे तसेच घरगुती भांडी/ वस्तुंकरिता अर्थसहाय्य | मृत जनावरांना मदत/ कुक्कुटपालन शेडच्या नुकसानी साठी मदत | पुर्णत: नष्ट/ अंशत पडझड झालेली कच्ची/ पक्की घरे, नष्ट झालेल्या झोपड्या व गोठ्यांसाठी अनुदान | | हस्तकला/ हातमाग कारागीर / बारा बलुतेदार यांना मदत | मत्स्य व्यावसायिकां च्या नुकसानी करिता अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | बाधित क्षेत्र | २२४५ २४५२ | २२४५ ०१५५ | २२४५ ०३१५ | २२४५ ०२७१ | २२४५ २३२७ | २२४५ २३८१ | २२४५ ०३२४ |
| १ | कोकण | मार्च, एप्रिल व मे, २०२२ | २८.०७.२०२२ | रत्नागिरी | १७५.४४ | ३१.६१ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| २ | कोकण | जुलै, २०२१ | २३.०९.२०२२ | सिंधुदूर्ग | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ८.८१ | १३१.८० | ६९.२१ | ०.०० |
| ३ | कोकण | एप्रिल ते डिसेंबर, २०२१ | २३.०३.२०२२ | रत्नागिरी | ०.०० | ०.०० | ०.०० | २.४७ | ३०.१८ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| ४ | कोकण | ऑगस्ट-सप्टेंबर,२०२१ | ०९.१०.२०२१ | ठाणे | ०.०० | ०.०० | ४.०० | ३.६० | २४.४१ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | पालघर | ०.०० | ०.०० | | ०.३७ | २१.५० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | रायगड | ०.०० | ०.०० | १६.१० | ३.०७ | ८.९४ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | रत्नागिरी | ०.०० | ०.०० | ११.३८ | ०.३० | २८.७६ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | सिंधुदूर्ग | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | १.५६ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | **एकूण** | ०.०० | ०.०० | ३१.४८ | ७.३४ | ८५.१७ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| **कोकण एकूण** | | | | | **१७५.४४** | **३१.६१** | **३१.४८** | **९.८१** | **१२४.१६** | **१३१.८०** | **६९.२१** | **०.००** |
| ५ | अमरावती | जून ते ऑक्टोबर, २०२१ | १७.०१.२०२२ | बुलढाणा | ०.०० | ०.०० | ०.०० | १४.१८ | ४९.१० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | १४.०९.२०२२ स्मरणपत्र | एप्रिल ते जुलै, २०२१ | | अमरावती | ०.०० | ०.०० | ०.०० | ९.६१ | १११.२२ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | जानेवारी, २०२२ | ०८.०३.२०२२ | अमरावती | १५०७०.९७ | १७१२.८७ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | डिसेंबर, २०२१ | ०४.०३.२०२२ | अमरावती | १८६४८.२८ | २०४०.४२ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | अकोला | १७१७३.९५ | १५०४.९७ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | बुलडाणा | ३६९७.०८ | २८४.८४ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | वाशिम | ५५१८.६९ | ६१४.५० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | **एकूण** | **४५०३८.००** | **४४४४.७३** | **०.००** | **०.००** | **०.००** | **०.००** | **०.००** | **०.००** |
| ६ | अमरावती | मे, २०२२ | १५.०९.२०२२ | अकोला | ६३.५२ | ११.४३ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| ७ | अमरावती | एप्रिल व मे, २०२१ | १७.१०.२०२२ | अमरावती | ३६.६५ | ५.४४ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| ८ | अमरावती | ऑक्टोबर,२०२१ | १६.०२.२०२२ | अमरावती | ४१०१५.३२ | ५४५९.७७ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| ९ | अमरावती | ऑक्टोबर,२०२१ | ९.०६.२०२२ | अकोला | २९१६१.६८ | ३०७७.९२ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | यवतमाळ | २२७८२.१० | २२८०.०४ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | बुलडाणा | ८२०२४.२५ | ८२०८.१६ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | वाशिम | ४१०४९.६५ | ४११०.५१ | ०.०० | ०.९० | २.०४ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | **एकूण** | **१७५०१७.६८** | **१७६७६.६३** | **०.००** | **०.९०** | **२.०४** | **०.००** | **०.००** | **०.००** |
| **अमरावती एकूण** | | | | | **२७६२४२.१४** | **२९३१०.८७** | **०.००** | **२४.६९** | **१६२.३६** | **०.००** | **०.००** | **०.००** |

| | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १० | पुणे | एप्रिल, २०२२ | १८.०८.२०२२ | सातारा | ०.०० | ०.०० | ०.०० | २.२५ | २९.३४ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| ११ | पुणे | जून ते ऑक्टोबर, २०२१ | १०.११.२०२१ | पुणे | ०.०० | ०.०० | ८४.३८ | ३.२४ | ५.६६ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | सातारा | ०.०० | ०.०० | ०.०० | ६.८५ | १.०२ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | सांगली | ०.०० | ०.०० | ०.०० | ६.०० | ०.२४ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | सोलापूर | ०.०० | ०.०० | ०.५५ | १६.३६ | १९.४४ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | कोल्हापूर | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.९० | ३.३६ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | **एकूण** | **०.००** | **०.००** | **८४.९३** | **३३.३५** | **२९.७२** | **०.००** | **०.००** | **०.००** |
| १२ | पुणे | ऑगस्ट सप्टेंबर, २०२१ | १३.१०.२०२१ | सातारा | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.३० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | सोलापूर | ०.०० | ०.०० | ४.०० | ४.३१ | १.८० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | कोल्हापूर | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.१२ | ४.२० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | **एकूण** | **०.००** | **०.००** | **४.००** | **४.७३** | **६.००** | **०.००** | **०.००** | **०.००** |
| १३ | पुणे | जुलै, २०२१ | ०९.०३.२०२२ | पुणे | ०.०० | ७.५१ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | सातारा | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.५० | ०.०० |
| | | | | **एकूण** | **०.००** | **७.५१** | **०.००** | **०.००** | **०.००** | **०.००** | **०.५०** | **०.००** |
| १४ | पुणे | जून, २०२० | १६.०३.२०२२ | पुणे | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | १२५.८७ | ०.०० | ०.०० |
| १५ | पुणे | डिसेंबर, २०२१ | ०९.०३.२०२२ | पुणे | ०.०० | ०.०० | ०.०० | ८४.२० | ०.१२ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| १६ | पुणे | जुलै, २०२१ | २९.०३.२०२२ | सातारा | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ३०.२३ |
| **पुणे एकूण** | | | | | **०.००** | **७.५१** | **८८.९३** | **१२४.५३** | **६५.१८** | **१२५.८७** | **०.५०** | **३०.२३** |
| १७ | नाशिक | नोव्हेंबर,२०२१ ते मे, २०२२ | २७.०९.२०२२ | नाशिक | ३८९०६.०२ | ६४३३.५९ | ०.०० | २.२० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| १८ | | | २७.०९.२०२२ | धुळे | ४३४५.४२ | ४९४.१५ | ०.०० | ०.७१ | २.२८ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | नंदुरबार | १८७.६३ | २०.१६ | ०.०० | १४.८३ | ८.३२ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | जळगांव | ९०७.८९ | १४७.१६ | ०.०० | ०.०० | १.६२ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | अहमदनगर | १४००.४८ | १५९.३५ | ०.०० | १२.४९ | ०.४५ | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | **एकूण** | **४५७४७.४४** | **७२५४.४१** | **०.००** | **३०.२३** | **१२.६७** | **०.००** | **०.००** | **०.००** |
| १९ | नाशिक | ऑक्टोबर, २०२१ | ०८.१२.२०२१ | अहमदनगर | १५३५१.३७ | १७९६.१२ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| **नाशिक एकूण** | | | | | **६१०९८.८१** | **९०५०.५३** | **०.००** | **३०.२३** | **१२.६७** | **०.००** | **०.००** | **०.००** |
| २० | औरंगाबाद | नोव्हेंबर व डिसेंबर, २०२१ | २४.०२.२०२२ | औरंगाबाद (छ.संभाजीनगर) | ८४७.७५ | १०३.०९ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | स्मरणपत्र २९.०.२०२२ | | | जालना | ७३१.१२ | ९२.५२ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | नांदेड | २३१४.०० | १५७.३५ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | **एकूण** | **३८९२.८७** | **३५२.९६** | **०.००** | **०.००** | **०.००** | **०.००** | **०.००** | **०.००** |
| | | मे, २०२२ | | नांदेड | २.७४ | ०.४९ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | लातूर | १६.४० | २.९५ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | उस्मानाबाद (धाराशिव) | १३.३० | २.३९ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | **एकूण** | **३२.४४** | **५.८३** | **०.००** | **०.००** | **०.००** | **०.००** | **०.००** | **०.००** |
| २१ | औरंगाबाद | नोव्हेंबर, २०२१ ते मे, २०२२ | ०४.११.२०२२ | औरंगाबाद (छ.संभाजीनगर) | ०.०० | १०३.०९ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | जालना | ०.०० | ९२.५२ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | परभणी | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | हिंगोली | ०.०० | ०.०० | ०.०० | २.०५ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | नांदेड | ०.०० | १५७.८५ | ०.०० | ४.४६ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | बीड | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | लातूर | ०.०० | २.९५ | ०.०० | ६.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | उस्मानाबाद (धाराशिव) | ०.०० | २.३९ | ०.०० | ८.४३ | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | | | | **एकूण** | **०.००** | **३५८.८०** | **०.००** | **२०.९४** | **०.००** | **०.००** | **०.००** | **०.००** |
| **औरंगाबाद एकूण** | | | | | **३९२५.३१** | **७१७.५९** | **०.००** | **२०.९४** | **०.००** | **०.००** | **०.००** | **०.००** |
| **एकूण राज्य** | | | | | **३४१४४१.७०** | **३९११८.११** | **१२०.४१** | **२१०.२०** | **३६४.३७** | **२५७.६७** | **६९.७१** | **३०.२३** |